**नवनिर्मित पंचायत समिती चाकूर (जि.लातूर) प्रशासकीय व निवासी इमारतीच्या बांधकामाच्या ठिकाणी रस्ता, नाली बांधकाम व संरक्षक भिंतीच्या उप कामास प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन.**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई २००९/प्र.क्र.१५४/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ३० नोव्हेंबर, २००९.

संदर्भ : १) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.पंसई २००७/प्र.क्र.२२/पंरा-७, दि.२०.३.२००७
२) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.पंसई २००७/प्र.क्र.१११/पंरा-७, दि.८.१०.२००७.
४) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., लातूर , यांचे पत्र क्र.जिपला/बांध/कार्या-२/७१५, दि.७.११.२००९

**प्रस्तावना :-**

नवनिर्मित चाकूर पंचायत समितीच्या प्रशासकीय व निवासी इमारतीच्या बांधकामास संदर्भीय अनुक्रमे दिनांक २०.३.२००७ व दिनांक ८.१०.२००७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. चाकूर पंचायत समितीच्या प्रशासकीय व निवासी इमारतीच्या बांधकामाच्या प्रस्तावामध्ये अंतर्गत रस्ते, नाली बांधकाम व संरक्षक भिंतीच्या बांधकामाचा समावेश करण्यात आलेला नव्हता. आता, मुख्य इमारतींची कामे जवळपास पूर्ण होत आलेली असून, वरील उपकामे हाती घेण्याच्या अनुषंगाने (१) प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी अंतर्गत रस्ता व नाली बांधकाम करणे- रु.१९.५० लक्ष, (२) निवासी इमारतीच्या ठिकाणी अंतर्गत रस्ता व नाली बांधकाम करणे- रु.१९.५० लक्ष, (३)गट विकास अधिकारी/सभापती निवासस्थाना लगत संरक्षक भिंत बांधकाम करणे रु.४.४० लक्ष व (४) कर्मचारी निवासस्थानालगत संरक्षक भिंत बांधकाम करणे रु.६.२५ लक्ष अशा एकूण रु.४९.६५ लक्ष अंदाजपत्रकीय किंमतीच्या प्रस्तावास मान्यता देण्याबाबत अति.मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प.,लातूर यांनी संदर्भीय दिनांक ७.११.२००९ च्या पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**-: शासन निर्णय :-**

नवनिर्मित चाकूर (जिल्हा लातूर) पंचायत समितीच्या प्रशासकीय व निवासी इमारतीच्या मूळ बांधकामामध्ये खालील एकूण रक्कम रु. ४९,६५,०००/-(अक्षरी रुपये एकोणपन्नास लक्ष पासष्ट हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या उपकामांना या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

| क्र. | कामाचा तपशिल | अंदाजपत्रकीय किंमत |
|---|---|---|
| १ | प्रशासकीय इमारतीलगत अंतर्गत रस्ते व नाली बांधकाम | रु.१९.५० लक्ष |
| २ | निवासी इमारतीलगत अंतर्गत रस्ते व नाली बांधकाम | रु.१९.५० लक्ष |
| ३ | गट विकास अधिकारी/सभापती निवासस्थानाकरीता संरक्षक भिंत बांधकाम | रु.४.४० लक्ष |
| ४ | कर्मचारी निवासस्थानाकरीता संरक्षक भिंत बांधकाम | रु.६.२५ लक्ष |
| | **एकूण** | **रु.४९.६५** लक्ष |

२. या कामी उपलब्धतेनुसार अनुदान स्वरुपात, अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे निधी वितरीत केल्यानंतर बांधकामावरील खर्च लेखाशिर्ष "२५१५ इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायत राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१)(०३) जिल्हा परिषदांच्या इमारत बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने- २५१५००५३" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा.

३. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

४. सदर प्रस्तावाची छाननी मुख्य अभियंता, प्रमंग्रासयो (ग्रामविकास विभाग) यांनी केली आहे.

५. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या http://maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र.**२००९१२०२१२५१११३००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,
१) विभागीय आयुक्त औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर
४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद,लातूर
६) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा-लातूर
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
८) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा लातूर विभाग, लातूर
९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, लातूर
१०) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, चाकूर, जिल्हा-लातूर
११) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३) सार्वजनिक बांधकाम विभाग, इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
१४) का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई